**महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याकांकडून चालविण्यात येणाऱ्या शैक्षणिक संस्थांना धार्मिक/भाषिक अल्पसंख्याक संस्था म्हणून दर्जाची मान्यता देण्यासाठी कार्यपध्दती, अटी व शर्ती विहित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग,**

शासन पूरकपत्र क्रमांक : अशैसं-२००९/प्र.क्र.१४८/२००९/का-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७.१०.२००९.

संदर्भ:- १ शासन अधिसूचना, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. असंस-२००८/प्र.क्र.१४९/०८/का.-१, दि.४ जुलै,२००८.
२ शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अशैसं-२००८/प्र.क्र.१३३/२००८/का.-१, दि.४ जुलै,२००८.

**शासन निर्णय :-**

शासनाने राज्यातील अल्पसंख्याकाकडून चालविण्यात येणा-या शैक्षणिक संस्थाना धार्मिक/भाषिक अल्पसंख्याक दर्जाची मान्यता प्रदान करण्यासाठी कार्यपध्दती, अटी व शर्ती शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अशैसं-२००८/प्र.क्र.१३३/२००८/का.-१, दि.४ जुलै,२००८ याव्दारे विनियमित केल्या आहेत. सदर शासन निर्णयात खालील बाबींचा अंतर्भाव करण्यात येत आहे.

*अ) परिच्छेद (२) मधील निकष ५) नंतर खालील निकषाचा समावेश करण्यात येत आहे.*

**६) अर्जदार संस्थेचे सदस्य/विश्वस्त महाराष्ट्रातील रहीवासी असावेत.**

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२००९१०२७१५५९२५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
**( टी.एफ.थेक्केकरा )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
प्रबंधक, मूळ न्याय शाखा/अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, नागपूर खंडपीठ, नागपूर
प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद
प्रबंधक, लोक आयुक्त कार्यालय, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर व इतर संबंधित कार्यालये.
निवडनस्ती (कार्या-५ )